**कारागृह उपमहानिरिक्षक या पदावरील पदोन्नतीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
गृह विभाग,
शासन आदेश क्रमांक :जेएलई-११०८/१२४६/प्र.क्र.३६/तुरुंग-१,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक: ९ सप्टेंबर, २०११

**आदेशः**

कारागृह विभागातील अधीक्षक मध्यवर्ती कारागृह (वेतन श्रेणी रु.१५६००-३९१०० ग्रेड वेतन ७६००) या पदावर कार्यरत असलेल्या खालील अधिका-यांना कारागृह उपमहानिरिक्षक (वेतन श्रेणी रु.३७४००-६७००० ग्रेड वेतन ८९००) या पदावर त्यांच्या नावासमोर दर्शविल्याप्रमाणे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या सहमतीच्या अधीन राहून तात्पुरत्या स्वरुपात तदर्थ (Adhoc) पदोन्नती देण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिका-याचे नाव व प्रवर्ग | पद व सध्याचे कार्यालय | पदोन्नतीचे पद व नियुक्तीचे कार्यालय |
|---|---|---|---|
| १ | श्रीमती स्वाती साठे (खुला) | अधीक्षक, नाशिकरोड मध्यवर्ती कारागृह | कारागृह उपमहानिरिक्षक मुख्यालय, पुणे |
| २ | श्री.राजेंद्र धामने (इ.मा.व.) | अधीक्षक, मुंबई मध्यवर्ती कारागृह | कारागृह उपमहानिरिक्षक पश्चिम विभाग,पुणे |
| ३ | श्री.सु.ना.चव्हाण (अ.जा.) | प्राचार्य, दौलतराव जाधव,तुरुंग अधिकारी प्रशिक्षण महाविद्यालय, येरवडा, पुणे | कारागृह उपमहानिरिक्षक मध्य विभाग, औरंगाबाद |

२. वरील अधिका-यांना देण्यात आलेली पदोन्नती ही खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

अ) श्रीमती स्वाती साठे, श्री.सु.ना.चव्हाण व श्री.राजेंद्र धामने यांना सामान्य प्रशासन विभागाच्या दि.०२.०४.१९७६ च्या शासन परिपत्रकातील तरतूदी विचारात घेऊन त्यांच्या विरुध्द सुरु/प्रस्तावित असलेल्या विभागीय चौकशीच्या अधीन राहील.

ब) मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे प्रलंबित असलेल्या याचिका क्रमांक ८४५२/२००४ वरील अंतिम निर्णयाच्या अधीन राहील.

क) उपरोक्त अधिका-यांच्या पदोन्नतीचे आदेश त्यांना वयाच्या ५०/५५ व्या वर्षापलिकडे शासन सेवेत ठेवण्याविषयीच्या सर्वसाधारण आदेशांच्या अधीन असतील.

ड) या तदर्थ पदोन्नतीमुळे संबंधित अधिका-यांना नियमित पदोन्नतीचे म्हणजेच जेष्ठतेचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

३. वर नमूद केलेल्या अधिका-यांना पदोन्नतीच्या ठिकाणी रुजू होण्याकरिता अपर पोलीस महासंचालक (कारागृह) यांनी तात्काळ कार्यमुक्त करावे व या सर्व अधिका-यांनी त्यांच्या नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ रुजु व्हावे.

४. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या बेवसाईटवर प्रसिध्द करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०११०९०९१६४४२२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( स. नु. गावीत )**
**शासनाचे सहसचिव**

प्रति,

मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
मा.उपमुख्यमंत्र्यांचे सचिव
मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
प्रधान सचिव,(सेवा) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,मुंबई-४०० ०३२
प्रधान सचिव (अ.व सु.) गृह विभाग, मंत्रालय,मुंबई-४०० ०३२
अपर पोलीस महासंचालक (कारागृह),कारागृह महानिरिक्षणालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
कारागृह उपमहानिरिक्षक, मध्य विभाग, औरंगाबाद/पूर्व विभाग, नागपूर/
पश्चिम विभाग, पुणे/दक्षिण विभाग, मुंबई/ कारागृह महानिरिक्षणालय,मुख्यालय, पुणे.
महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरिक्षा), मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरिक्षा), नागपूर
महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता ), मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता ), नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
मा.मंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव
जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,औरंगाबाद,नाशिक
संबंधित अधिकारी
सामान्य प्रशासन विभाग का.१८
निवडनस्ती कार्यासन तुरुंग-१